**राज्यात माहे नोव्हेंबर व डिसेंबर, २०१४ मध्ये अवेळी पाऊस व गारपीट यामुळे झालेल्या जीवित व वित्त - हानीपोटी आपद्ग्रस्तांना मदत व सवलत देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- सीएलएस २०१५/प्र.क्र.२/म-३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ४ फेब्रुवारी, २०१५

**वाचा :**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस ५९८३/२४८३६१/ प्र.क्र.८२०/म-३, दि. ३१.०१.१९८३
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस २०१२/ प्र.क्र.१५७/म-३, दि. ३०.०१.२०१४.
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस २०१२/प्र.क्र.१५७/म-३, दि. ५.८.२०१४
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. एससीवाय २०१४/प्र.क्र.२३१/म-७, दि. २५.११.२०१४

**प्रस्तावना:-**

राज्यात माहे नोव्हेंबर व डिसेंबर, २०१४ मध्ये अवेळी पाऊस व गारपीट यामुळे काही प्रमाणात जीवितहानी (व्यक्ती व जनावरे) व वित्त हानी (घरांची पडझड, मालमत्तेचे नुकसान) झाली आहे. तसेच शेतजमिनीचे आणि शेतीपिकांचे देखील काही प्रमाणात नुकसान झाले आहे. राज्यामध्ये अवेळी पाऊस व गारपीट यामुळे झालेल्या जीवित व वित्तहानीपोटी आपद्ग्रस्तांना विशेष दराने मदत देण्याबाबत व संदर्भाधीन दिनांक २५.११.२०१४ च्या शासन निर्णयातील सवलती देण्याबाबत विधीमंडळामध्ये जाहीर करण्यात आले होते. त्या अनुषंगाने माहे नोव्हेंबर-डिसेंबर, २०१४ या कालावधीत अवेळी पाऊस व गारपीट यामुळे झालेल्या जिवीत व वित्तहानीबाबत बाधित आपद्ग्रस्तांना "विशेष बाब" म्हणून पुढीलप्रमाणे मदत देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यात माहे नोव्हेंबर व डिसेंबर, २०१४ मध्ये अवेळी पाऊस व गारपीट यामुळे व्यक्ती व जनावरे यांची जीवितहानी, घरांची पडझड, शेतजमीनीचे आणि शेतीपिकांचे काही प्रमाणात नुकसान झाले आहे. सदर आपत्तीत नुकसान झालेल्या आपद्ग्रस्तांना खालीलप्रमाणे मदत व सवलत देण्यात यावी.

(अ) **मदत -**

| क्र. | बाब | आर्थिक सहाय्याचे दर |
|---|---|---|
| १. | **मृत व्यक्तींच्या वारसांना मदत** | |
| | अ) मृत्यूमुखी पडलेल्या व्यक्तींच्या वारसांना मदत (कुटुंबातील कर्ता व्यक्ती असल्यास) | रु.१,५०,०००/- प्रती व्यक्ती<br>रु. १,००,०००/- (मुख्यमंत्री निधी)<br>रु. २,५०,०००/- (एकूण) |
| | ब) मृत्यूमुखी पडलेल्या व्यक्तींच्या वारसांना मदत | रु .१,५०,०००/- |
| २. | **मृत जनावरांच्या मालकांना मदत** | |
| | अ) मोठे जनावर (उदा.गाय, बैल, म्हैस इ.) | रु.२५,०००/- (मर्यादा-१) |
| | ब) मध्यम जनावर (उदा.गाढव, खेचर इ.) | रु.१०,०००/- (मर्यादा-२) |
| | क) लहान जनावर (उदा.वासरु, बगारु इ.) | रु.५,०००/- (मर्यादा-२) |
| | ड) लहान जनावर (उदा.शेळी, मेंढी इ.) | रु.३,५००/- (मर्यादा-४) |
| ३. | **पडझड झालेल्या घरांसाठी मदत** | |
| | अ) पूर्णत: उध्वस्त झालेले पक्के घर | रु .७०,०००-/ |
| | ब) पूर्णत: उध्वस्त झालेले कच्चे घर | रु .२५,०००-/ |
| | क) अंशत: उध्वस्त झालेले पक्के / कच्चे घर (घराचे १५% अथवा त्यापेक्षा अधिक नुकसान असल्यास) | रु .१५,०००-/ |
| ४. | **पिकांचे नुकसान** | |
| | अ) कोरडवाहू शेतीपिके | रु.१०,०००/- प्रति हे. |
| | ब) आश्वासित सिंचनाखालील पिके | रु.१५,०००/- प्रति हे. |
| | क) बहुवार्षिक पिके (फळबागा) | रु.२५,०००/- प्रति हे. |
| ५. | **शेतजमिनीचे नुकसान** | |
| | अ) खरडून गेलेली जमीन | रु.२०,०००/- प्रति हेक्टर |
| | ब) वाहून गेलेली जमीन | रु.२५,०००/- प्रति हेक्टर |

शेतीपिके, फळपिके व शेतजमीनीच्या नुकसानीसाठी २ हेक्टर क्षेत्र मर्यादेपर्यंत उपरोक्त मदत अनुज्ञेय राहील. कोरडवाहू व ओलिताखाली शेतीसाठी मदतीची किमान मर्यादा रुपये ७५०/- व बहुवार्षिक फळपिकांकरिता मदतीची किमान मर्यादा रुपये १५००/- इतकी राहील.

(ब) **सवलती :-**

१) जमीन महसुलात सूट,
२) सहकारी कर्जाचे पुनर्गठन,
३) शेतीशी निगडीत कर्जाच्या वसुलीस स्थगिती (एक वर्षासाठी स्थगिती)
४) कर्जावरील व्याज माफ (तीन महिन्याच्या कालावधीसाठी)
५) तिमाही वीज बिलात माफी
६) परीक्षा शुल्कात माफी व १० वी आणि १२ वी च्या विद्यार्थ्यांची फी माफी

सदर सवलतींबाबत संबंधित प्रशासकीय विभागाने आवश्यकतेनुसार सविस्तर आदेश निर्गमित करावेत. तसेच त्याबाबतच्या निधीची तरतूद करुन ती आपद्ग्रस्तांना तातडीने वाटप करावी.

२. वरील परिच्छेद क्र.१ मध्ये नमूद करण्यात आलेल्या मदतीव्यतिरिक्त अन्य बाबींसाठी शासन परिपत्रक, दि.५ ऑगस्ट, २०१४ अनुसार मदत वितरीत करण्यात यावी. सदर मदत बाधितांना तातडीने उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही संबंधित जिल्हाधिकारी यांनी करावी.

३. शेती व फळ पिकाच्या नुकसानीसाठी मदतीचे वाटप करताना खालीलप्रमाणे दक्षता घेण्यात यावी.

i) प्रचलित नियमानुसार शेती / बहुवार्षिक फळपिकाच्या नुकसानीकरीता मदत ५० टक्के अथवा त्याहून अधिक नुकसान झालेल्यांना अनुज्ञेय राहील.

ii) प्रचलित पध्दतीनुसार कृषी सहायक, तलाठी व ग्राम सेवक यांच्या संयुक्त स्वाक्षरीने पूर्ण करण्यात आलेल्या पंचनाम्याबाबत शासनास सादर करण्यात आलेल्या अहवालानुसार मदतीचे वाटप जिल्हाधिकारी यांनी करावे.

iii) संबंधित बाधितांच्या बँक बचत खात्यात मदतीची रक्कम थेट जमा करण्यात यावी.

iv) कोणत्याही बाधितांना रोखीने किंवा निविष्ठा स्वरुपात मदत करण्यात येऊ नये.

v) शेत जमिनीच्या झालेल्या नुकसानीकरीता मदतीची रक्कम खातेदारांच्या बँक खात्यावर थेट जमा करताना मदतीच्या रक्कमेमधून कोणत्याही बँकेने कोणत्याही प्रकारची वसुली करु नये. याकरिता सहकार विभागाने योग्य ते आदेश निर्गमित करावेत.

vi) सदर निर्णयान्वये शेतकऱ्यांना देण्यात येणारी मदत ही विशेष बाब असल्यामुळे पूर्वोदाहरण म्हणून गणली जाणार नाही.

४. वरील परिच्छेद क्र.१ (अ) मध्ये नमूद करण्यात आलेल्या मदतीसाठी लागणारा खर्च "२२४५, नैसर्गिक आपत्तींच्या निवारणासाठी सहाय्य (योजनेतर)" या मुख्य लेखाशीर्षामधून भागविण्यात यावा. तसेच परिच्छेद क्र.१ (ब) मध्ये नमूद सवलतीसाठी लागणारा खर्च संबंधित प्रशासकीय विभागाने करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०५१३२१४८२६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Ashok Rajaram Jagtap

Digitally signed by Ashok Rajaram Jagtap
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Rajaram Jagtap
Date: 2015.02.05 13:32:33 +05'30'

**(अ.रा.जगताप)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग),

२) विभागीय आयुक्त (सर्व)

३) जिल्हाधिकारी (सर्व)

४) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई

५) महालेखापाल कोषागार -२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर
६) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
७) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
८) सह सचिव (कार्यासन म-११), मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय,मुंबई
९) कार्यासन अधिकारी , कार्यासन( अर्थसंकल्प-६/व्यय-९) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
१०) कार्यासन अधिकारी, कार्यासन (ज-१/आव्यप्र-१/आव्यप्र-२/म-७/म-११), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) कार्यासन अधिकारी, कार्यासन (१०-अे/१३-अे), कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) कार्यासन अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवडनस्ती म-३ कार्यासन,

**<u>प्रत माहितीसाठी अग्रेषित :-</u>**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा.मंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-३२
४) मा.राज्यमंत्री,मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
५) मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई-३२.
६) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, यांचे स्वीय सहायक, विधानभवन,मुंबई.
७) सचिव, मदत व पुनर्वसन यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई-३२
८) सचिव व संचालक, आपत्ती व्यवस्थापन, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

*****